**महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत कृषि महाविद्यालय, पुणे येथील विविध इमारतींमध्ये व सभागृहामध्ये आग नियंत्रण व अग्निसुरक्षा प्रणाली <u>बसविणे बाबतच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...</u>**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक-मफुवि-१४२४/प्र.क्र.६८/७-अे.**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२

दिनांक: १५ मार्च,२०२४.

**संदर्भ :**१.संचालक (विस्तार शिक्षण व सासावि), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे पत्र क्र.मकृप/वि.शि.२/८७५/२०२४. दि.०७.०३.२०२४.

२.कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र.कृमवि/बा.ध/का.प/६२००/२०२४.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम(भाग-२). दि.२०.०९.२०१९.

<u>प्रस्तावना:-</u>

महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६ व महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना (सुधारणा) अधिनियम, २०२३ (Maharashtra Fire Prevention and Life Safety Measures (Amendment) Act, २०२३) नुसार, सर्व इमारती व सभोवतालचा परिसर, औद्योगिक इमारतींमध्ये अग्निशमन यंत्रणा कार्यान्वित करणे आवश्यक आहे.

महात्मा फुले कृषि विद्यापीठ अंतर्गत कृषि महाविद्यालय, पुणे महाविद्यालयाची स्थापना १९०७ साली झाली. भारतात स्थापन झालेले पहिल्या पाच कृषि महाविद्यालयांपैकी हे एक आहे. कृषि महाविद्यालयाच्या परिसरात उद्यानविद्या, एम.बी.ए.(कृषि) इत्यादी कृषि महाविद्यालये देखील आहेत. या सोबतच या महाविद्यालयाच्या अंतर्गत नविन शताब्दी इमारत, विविध वारसा इमारती, अतिथी गृहे, वसतिगृहे, निवास स्थाने, इत्यादी इमारतींचा समावेश आहे. सदर महाविद्यालयास ११२ वर्षांपेक्षा जास्त कालावधी झालेला आहे. तसेच, या महाविद्यालयातील मुख्य प्रशासकीय इमारत, ग्रंथालय, दस्ताऐवज खोल्या, सभागृहे, वसतीगृहे येथे देखील अग्निशमन व अग्निसुरक्षा प्रणाली कार्यरत नाही.

महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांच्या दि.२६.१२.२०२३ रोजीच्या ११३ व्या बैठकीमध्ये मा.मंत्री (कृषि) यांनी कृषि विद्यापीठातील इमारतींना अग्निशमन यंत्रणा उभारण्याबाबतचे प्रस्ताव शासनाच्या प्रशासकीय व वित्तीय मान्यतेकरीता पाठविण्यात यावेत, अशी शिफारस केली होती. त्यासअनुसरुन, संदर्भ क्र.१ व २ अन्वये महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत कृषि महाविद्यालय, पुणे येथील विविध इमारतींमध्ये व सभागृहामध्ये आग नियंत्रण व अग्निसुरक्षा प्रणाली बसविणेबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

२. महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका, १९७८ मधील परिच्छेद क्र. १३४ (१) मध्ये इमारतींच्या बांधकामाच्या नकाशास व अंदाजित खर्चास (वित्तीय मान्यता धरुन) प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार वित्त विभाग, शासन निर्णय दि.२०.०९.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत.

३. महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत कृषि महाविद्यालय, पुणे येथील विविध इमारतींमध्ये व सभागृहामध्ये आग नियंत्रण व अग्निसुरक्षा प्रणाली बसविणेसाठी रु.१२५१.६५ लाख खर्च येणार आहे. रुपये १५ कोटीपेक्षा कमी किंमत असलेल्या अंदाजपत्रकीय रकमेच्या कामांच्या ढोबळ अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या क्षेत्रीय स्तरावरील तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिकाऱ्याने तांत्रिक सहमती प्रदान केल्यानंतर क्षेत्रीय स्तरावरील सर्वोच्च तांत्रिक अधिकारी, मुख्य अभियंता, यांचेकडून शिफारशींसह प्राप्त अंदाजपत्रकानुसार उपभोक्ता विभागाने त्यांचेकडील कामाची निकड व अनुदानाच्या उपलब्धतेनुसार विहीत कार्यपद्धतीने प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास आहेत. सदर प्रकरणी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांनी, अधीक्षक अभियंता, पुणे प्रादेशिक विद्युत मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांनी काढलेल्या त्रुटी पूर्ततेच्या अधीन राहून, सदर प्रस्तावास तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तसेच, सदर अग्निशमन यंत्रणा उपलब्ध करुन देण्याच्या कामाची निकड लक्षात घेता कृषि परिषदेने आगामी ११४ व्या बैठकीमध्ये मान्यता देण्याच्या अधीन राहून मा. मंत्री (कृषि) तथा अध्यक्ष, कृषि परिषद यांनी पूर्वमान्यता प्रदान केली आहे.

४. वरील सर्व बाबींचा विचार करता, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत कृषि महाविद्यालय, पुणे येथील विविध इमारतींमध्ये व सभागृहामध्ये आग नियंत्रण व अग्निसुरक्षा प्रणाली बसविणे आवश्यक असल्याने रु.१२५१.६५ लाख इतक्या रक्कमेच्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत कृषि महाविद्यालय, पुणे येथील विविध इमारतींमध्ये व सभागृहामध्ये आग नियंत्रण व अग्निसुरक्षा प्रणाली बसविण्याबाबतच्या रु.१२५१.६५ लाख इतक्या रक्कमेच्या खर्चास शासन प्रशासकीय मान्यता देत आहे. (सविस्तर तपशिल **परिशिष्ट-अ** व **परिशिष्ट-ब** नुसार राहील.)

**२.** या बाबीसाठी येणारा खर्च, मागणी क्र.डी-३, कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१, पीकसंवर्धन, (२४१५ ००७२) ३५, भांडवली मत्ता निर्मितीकरीता अनुदान या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**३.** अग्नीशमन यंत्रणा उभारणीसाठी, स्थानिक स्वराज्य संस्था, महसूल विभाग, नगररचना विभाग, पर्यावरण विभाग इ. स्थानिक विभागांच्या आवश्यक परवानगी घेण्यात याव्यात.

**४.** सदर कामांसाठी प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

**५.** महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६ व महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना (सुधारणा) अधिनियम,२०२३ मधील तरतूदींनुसार अग्नीशमन यंत्रणा सदर इमारतींमध्ये कार्यान्वित करण्यात यावी व अग्नीशमन यंत्रणा पुरविण्याचे काम महाराष्ट्र अग्नीशमन संचालनालय, मुंबई यांनी मंजूर केलेल्या परवाना संस्थेमार्फत करण्यात यावे.

**६.** सदरील काम शासनाचे विहित पद्धतीनुसार परवानाधारक व शासनाकडे नोंदणीकृत विद्युत ठेकेदाराकडूनच करुन घेण्यात यावे.

**७.** सदर कामासाठी वापरण्यात येणारे विद्युत साहित्य आय.एस. आय मार्कचे असावे.

८. वीजसंचमांडणी उभारणी प्रचलित केंद्रीय विद्युत प्राधिकरण अधिनियम २०२३, प्रचलित मानके, तसेच सार्वजनिक बांधकाम (विद्युत) विभागाचे विनिर्देशांमधील तरतुदींनुसार करण्यात यावी.

९. दरसूचीतील बाबींचे सार्वजनिक बांधकाम (विद्युत) विभागाकडून प्रसारित करण्यात आलेले विनिर्देश (Specifications) निविदेमध्ये समाविष्ट करणे बंधनकारक आहे.

**१०.** विषयांकीत कामाचे अंदाजपत्रकात नमूद केलेल्या बाबी तपासून त्याप्रमाणे त्यासाठीची मानके सार्वजनिक बांधकाम विभागाची विनिर्देशित मानके (रेड बुक), अनुषंगिक नियम व मानके, आय.एस.कोड यांना अधीन राहून त्या-त्या मानकांनुसार करण्यात यावे.

**११.** काम कार्यान्वित करण्यापूर्वी, अंदाजपत्रकात प्रस्तावित करण्यात आलेल्या तरतूदी योग्य असल्याबाबत तज्ञ सल्लागाराकडून तपासणी करुन खात्री करुन घेण्यात यावी.

**१२.** अधीक्षक अभियंता, पुणे प्रादेशिक विद्युत मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे तसेच, मुख्य अभियंता, पुणे यांनी उपस्थित केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता करुनच सदर काम हाती घ्यावे.

**१३.** सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग पाच अन्वये महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार या शिर्षाखालील अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेमधील परिच्छेद क्र.१३४ मधील तरतूदीन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

**१४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१५१९१०४६१९०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2024.03.15 19:20:35 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महासंचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
२. कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
३. कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
४. वित्तीय सल्लागार,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
५. नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
६. विद्यापीठ अभियंता, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.

८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.अहमदनगर.
१०.उपकोषागार अधिकारी, जि.अहमदनगर.
११.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१२.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१५.कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
१६.निवडनस्ती, कार्यासन-७ अे.

कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र : मफुवि-१४२४/प्र.क्र.६८/७-अे, दि.१५/०३/२०२४ सोबतचे परिशिष्ट

"परिशिष्ट -अ"

| Name of the Department : Agricultural Department | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **Name of Work : Providing firefighting system for various building at College of Agriculture Pune under Mahatma Phule Krishi Vidyapeeth, Rahuri.** | | | | | |
| **RECAPITULATION SHEET** | | | | | |
| **Sr. No.** | **Particulars of Scope** | **Unit Rate Rs. Per (Sq.mtr/Meters Lumpsum..etc)** | | **Cost (Rs.)** | |
| | | | | **Component wise** | **Total** |
| **A** | **Essential Items (Components)** | | | | |
| 1 | Building Proper(Total Built up Area) | 15607.30 | | | |
| | Sub Total (a+b) | | **Total (A)** | 0.00 | 0.00 |
| | Sub Total ( c+d+e+f ) | | **Total (B)** | 0.00 | 0.00 |
| | Total (A) + Total (B) | | **Sub Total (1)** | 0.00 | 0.00 |
| 2 | **Water Supply and Sanitary Work - 3 % on Total (A)** | | **Sub Total (2)** | 0.00 | 0.00 |
| 3 | **Electrification** | | | | |
| | i) External & Internal Electrification | | | 0.00 | |
| | ii) Solar Water Pumps System (10HP) | | | | |
| | Sub Total ( i + ii ) | | **Sub Total (3)** | 0.00 | 0.00 |
| | **Sub Total ( A ) = Sub Total (1) + (2) + (3) =** | | | | 0.00 |
| B | **Miscellaneous Items** | | | | |
| | i) a) Chainlink Fencing @ 2539/- Rmt | | | | |
| | b) Gate | | | | |
| | ii) Parking (Two Wheeler & Cycle) | | | | |
| | iii) Land Scaping | | | | |
| | iv) Soil Investigation & Detail Land Survey | | | | |
| | Sub Total ( i + ii + iii + iv ) | | **Sub Total (B) =** | 0.00 | 0.00 |
| C | **Optional Items** | | | | |
| | i) Sprinkler System ( considering 100 % area ) | 15607.30 | 1795.86 | 28028525.78 | |
| | ii) Fire Fighting System ( considering 100 % area ) | 15607.30 | 2550.12 | 39800487.88 | |
| | iii) Fire Alarm System ( considering 100 % area ) | 15607.30 | 583.65 | 9109200.645 | |
| | Sub Total ( i + ii ) | | **Sub Total C =** | 76938214.3 | **76938214.3** |
| | **Project Cost ( P ) = ( Sub Total A + B + C )** | | | | **76938214.3** |
| D | Provision | | | | |
| | i) | - | - | | |
| | Sub Total ( i + ii ) | | **Sub Total ( I ) =** | 0.00 | 0.00 |
| | **Sub Total D = Project Cost ( P ) = Sub Total ( I ) =** | | | | |
| II | i) Contingencies 4 % on Project Cost ( P ) | | - | 3077528.572 | |
| | ii) GST 18 % on Sub Total ( D ) | | - | 13848878.57 | |
| | Sub Total ( i + ii ) | | Sub Total ( II ) = | 16926407.15 | 16926407.15 |
| | **Total Cost Of Project ( TPC ) = ( Sub Total D + Sub Total ( II )** | | | | 93864621.44 |
| | **Say Rs.** | | | | 93864621.44 |
| एकूण रु.नऊ कोटी, अडतीस लाख, चौसष्ट हजार, सहाशे एकवीस फक्त | | | | | |

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: CN = PRATIBHA MADHAV PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.15 19:22:19 +05'30'

( प्रतिभा पाटील )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र : मफुवि-१४२४/प्र.क्र.६८/७-अे, दि.१५/०३/२०२४ सोबतचे परिशिष्ट

"परिशिष्ट - ब"

**Name of the Department : Agricultural Department**

**Name of Work: Providing firefighting system for the New Auditorium at the College of Agriculture Pune under Mahatma Phule Krishi Vidyapeeth, Rahuri.**

**RECAPITULATION SHEET**

| Sr. No. | Particulars of Scope | Unit Rate Rs. Per (Sq.mtr/Meters Lumpsum..etc) | | Cost (Rs.) | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | Component wise | Total |
| **A** | **Essential Items (Components)** | | | | |
| 1 | Building Proper(Total Built up Area) | 0.00 | | | |
| | Sub Total (a+b) | | **Total (A)** | 0.00 | 0.00 |
| | Sub Total ( c+d+e+f ) | | **Total (B)** | 0.00 | 0.00 |
| | Total (A) + Total (B) | | **Sub Total (1)** | 0.00 | 0.00 |
| 2 | **Water Supply and Sanitary Work - 3 % on Total (A)** | | **Sub Total (2)** | 0.00 | 0.00 |
| 3 | **Electrification** | | | | |
| | i) External & Internal Electrification | | | 0.00 | 0.00 |
| | ii) Solar Water Pumps System (10HP) | | | | |
| | Sub Total ( i + ii ) | | **Sub Total (3)** | 0.00 | 0.00 |
| | **Sub Total ( A ) = Sub Total (1) + (2) + (3) =** | | | | 0.00 |
| B | **Miscellaneous Items** | | | | |
| | i) a) Chainlink Fencing @ 2539/- Rmt | | | | |
| | b) Gate | | | | |
| | ii) Parking (Two Wheeler & Cycle) | | | | |
| | iii) Land Scaping | | | | |
| | iv) Soil Investigation & Detail Land Survey | | | | |
| | Sub Total ( i + ii + iii + iv ) | | **Sub Total (B) =** | 0.00 | 0.00 |
| C | **Other Essential Items** | | | | |
| | Fire Fighting Arrangements | | | 26526218.77 | |
| | | | **Sub Total C =** | 26526218.77 | **26526218.77** |
| | **Project Cost ( P ) = ( Sub Total A + B + C )** | | | | **26526218.77** |
| D | Provision | | | | |
| | i) | - | - | | |
| | Sub Total ( i + ii ) | | **Sub Total ( I ) =** | 0.00 | 0.00 |
| | **Sub Total D = Project Cost ( P ) = Sub Total ( I ) =** | | | | |
| II | i) Contingencies 4 % on Project Cost ( P ) | | - | | |
| | ii) GST 18 % on Sub Total ( D ) | | - | 4774719.379 | |
| | Sub Total ( i + ii ) | | Sub Total ( II ) = | 4774719.379 | 4774719.379 |
| | **Total Cost Of Project ( TPC ) = ( Sub Total D + Sub Total ( II )** | | | | **31300938.15** |
| | **Say Rs.** | | | | **31300938** |

एकूण रु.तीन कोटी, तेरा लाख, नऊशे अडतीस फक्त

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: CN = PRATIBHA MADHAV PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.15 19:22:45 +05'30'

( प्रतिभा पाटील )

उप सचिव, महाराष्ट्र शासन